**दिवंगत नेते रा. सु. गवई यांच्या मौजे वडाळी ता. जि. अमरावती येथील स्मारकासाठी रु. २.५० कोटी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-स्मारक-२०१८/प्र.क्र.७४०/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ ऑक्टोंबर, २०१८.

वाचा:- शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. अमपा-२०१८/प्र.क्र.७३/नवि-२६, दि.२९.१०.२०१८

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन दिनांक २६ ऑक्टोंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिवंगत नेते श्री. रा. सु. गवई यांच्या स्मारकाच्या बांधकामाकरीता प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने दिवंगत नेते रा. सु. गवई यांच्या स्मारकासाठी रुपये २.५० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मौजे वडाळी ता. जि. अमरावती येथील दिवंगत नेते रा. सु. गवई यांच्या स्मारकासाठी रु. २.५० कोटी निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

१. उपरोक्त दिनांक २९ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार विहित अटी व शर्तीनुसार कार्यवाही करावी.

२. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी अमरावती यांनी शासनास व संबंधित महालेखापाल कार्यालयास तातडीने सादर करावे.

३. या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या एकुण रक्कम रुपये २,५०,००,०००/- (रुपये- अडीच कोटी फक्त) चे कार्यान्वयन यंत्रणेस वितरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, अमरावती यांना नियंत्रण अधिकारी तसेच जिल्हा प्रशासन अधिकारी, अमरावती यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी आहरीत करुन कार्यान्वयन यंत्रणेस वितरीत करावा.

४. यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, ८०, सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (८३) नागरी भागात स्मारके उभारण्यासाठी महानगरपालिकांना सहाय्यक अनुदान, ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर), (२२१७ A०३८) या लेखाशिर्षाखाली सदर लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ करिता रुपये मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील सोबतच्या परिशिष्टाच्या अ. क्र. (८) मधील तपासणी सूचीतील लागु होत असणाऱ्या बाबींची पुर्तता करण्यात आली आहे.

६. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक २ एप्रिल, २०१८ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२९१७११५६६६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shankar Trambak Jadhav

Digitally signed by Shankar Trambak Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD and Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cccfd79237cd08ae181b91f021d984be73c43b02234d4c07b7da787cf666bc54, cn=Shankar Trambak Jadhav
Date: 2018.10.29 18:17:18 +05'30'

**( शंकर जाधव )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
२) सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) मा. लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय
९) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी

१०) जिल्हाधिकारी, अमरावती
११) आयुक्त, अमरावती महानगरपालिका
१२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१४) जिल्हा प्रशासन अधिकारी, अमरावती
१५) वित्त विभाग, व्यय-३ / कोषा प्रशासन-५ / अर्थसं-१६ / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) अवर सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) कक्ष अधिकारी (नवि-२६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरचा शासन निर्णय विभागाच्या नागरीकांची सनद वर प्रसिध्द करण्यात यावा.
१९) निवडनस्ती (नवि-२०)